# नंदनवनाची सहल



लेखक: आर्थर योरिंक्स, रिचर्ड एगिएलस्की



# नंदनवनाची सहल

मराठी अनुवादः सुशील मेन्सन



एल, एक सभ्य, शांत, सज्जन पुरुष होता. तो एक द्वारपाल होता. आपला निष्ठावान कुत्रा एडी, याच्यासोबत तो वेस्ट साइड येथील एका खोलीत राहात असे. ते दोघे एकत्रच जेवत, एकत्रच काम करत, एकत्रच टिव्ही बघत. अशा आयुष्यात काय उणे असू शकते?



बरेच काही.

“हा कचरा बघा!” एडी गुरगुरला. “आपलं स्वत:चं घर असू शकत नाही का? एक छोटीशी परसबाग, जिथे मी फेरफटका मारू शकेन?”

“का नाही!” एल रागारागाने म्हणाला. “आज तुला घर पाहिजे. उद्या, कोण जाणे, चंद्रसुद्धा मागशील!”

“चंद्र? चंद्र?” एडी केकाटला. “कबुतर आपल्यापेक्षा चांगलं जगतात!”

एडी आणि एल यांचे आयुष्य साधेसरळ नव्हते. ते सतत काम करत, नेहमी संघर्ष करत. काहीना काही संकटाचा सामना त्यांना रोज करावा लागे.



एकदा सकाळी, एल आपली दाढी करत होता तेव्हा त्याने एक आवाज ऐकला. “हे, एल,” कुणीतरी म्हणाले. एलने वळून पाहिल्यावर त्याला एक पक्षी दिसला. एक महाकाय पक्षी.

“एल,” पक्षी म्हणाला, “तुला फार कष्ट करावे लागतात का? संघर्ष करतोस पण यश मिळत नाही का? हं? ऐक. मला एक अशी जागा माहितीय तिथे तुला कोणत्याही प्रकारची चिंता आणि काळजी नसेल – मस्त जागा आहे ती.”

“बरं?” एल म्हणाला. तो गोंधळला होता.

“एल, एल, एल! तुला थोडा बदल हवाय. उद्या, माझ्याकडे ये, पाहुणा म्हणून. एडीलासुद्धा आण. तुला ती जागा नक्की आवडेल!”

मग पंख फडफडवत पक्षी निघून गेला.

त्या रात्री एल आणि एडी यांच्यात काय चर्चा झाली असावी, याचा अंदाज तुम्ही लावू शकता. एडी तर आधीच आपले सामान बांधू लागला.

“काय? मी नोकरी सोडून देऊ?” एल म्हणाला.

“आयुष्यात झाडू आणि बालदी यांच्या व्यतिरिक्त बरंच काही आहे!” एडी म्हणाला.

“पण....”

“हेच ते, आपण जातोय. मला एकही शब्द ऐकायचा नाहीये.”

पहाटेच्या वेळी, ते दोघे बाथरूममध्ये होते, महाकाय पक्ष्याची वाट बघत.





महाकाय पक्षी आला आणि एल आणि एडी

यांना उचलून आभाळात हजारो फूट उंचीवर
एका बेटावर घेऊन गेला.



अविश्वसनीय! टवटवीत वृक्ष, चढ-उतार असलेले डोंगर, सुंदर सुंदर फुले आणि रोपटी, इथे-तिथे उडणारे पक्षी, चमचमत्या झऱ्यात पडणारे धबधबे.

“हे अद्भूत दृश्य बघितलंस!” एडी म्हणाला.

“व्वा!” एल म्हणाला.



तेथील पक्षी गाऊ लागले आणि त्यांच्यासाठी अन्न घेऊन आले. त्यांनी खाण्यापिण्याचा आस्वाद घेतला. ते तलावात पोहले. ते उन्हात बसले. आजवर त्यांनी एवढी मौज कधी केली नव्हती.

"एल, हे भयानक वाटतंय का?" महाकाय पक्ष्याने विचारले.

"काय आयुष्य आहे!" एल पुटपुटला. "इथे तर कुणीही आपलं संपूर्ण आयुष्य आरामात घालवू शकेल."

दिवस मजेत जात होते. त्यांच्या पूर्वायुष्याच्या आठवणी हळूहळू धूसर होत गेल्या. हेच खरंखुरं सुख, असे एल आणि एडी यांना वाटू लागले.



पण पिकलेले फळ काही काळाने सडतेसुद्धा.

एकदा सकाळी, एल जागा झाला आणि किंचाळला. “एडी! आपलं काय झालंय बघ! आपण पक्षी बनू लागलोय!”

खरंच. त्यांचे डोळे छोटे आणि गोल झाले होते. त्यांचे नाक पक्ष्यांच्या चोचीसारखे बनले होते.

“आपल्याला इथून पळून गेलं पाहिजे,” तो असहायपणे म्हणाला. त्यांना छोटे छोटे पंख आले होते. शेपटाला पिसेसुद्धा फुलली होती.



“मला परत ने, परत ने!” एडी बदकासारखा ओरडला. “मला पक्षी बनायचं नाहीये!”

“यापेक्षा मी झाडू मारीन!” एल पक्ष्यासारखा ओरडला. दोघांनी आपले पंख त्वेषाने फडफडवले आणि ते आभाळात झेपावले.



“एडी, जपून, माझ्या मागे ये,” एल कर्कशपणे म्हणाला. पण एडी, उन्मादात, गोल-गोल फिरत, उंच उंच उडू लागला.

उडून थकल्यावर तो समुद्रात जाऊन पडला आणि बुडून गेला.

एल मोठ्या मुश्किलिने सहीसलामत घरी पोहोचला. आपल्या मित्राच्या आठवणीने त्याला रडू आले.



पण सुदैवाने, एडी हा उत्तम पोहोणारा होता. पोहत पोहत तो थोड्याच वेळात वेस्ट साइडला पोहोचला.

“एडी!” एल आनंदाने ओरडला.

“एल....”





कधीकधी नंदनवन गमावूनही स्वर्गप्राप्ती होते ती अशी!

# समाप्त

